**पुणे व पिंपरी चिंचवड शहर येथील सीसीटीव्ही प्रकल्पासाठी गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीला प्रकल्पाच्या कार्यान्वयन/ सेवा कालावधीत आवश्यक बदल किंवा सुधारणा करण्यासाठी वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-०८१५/प्र.क्र.२७/भाग-१/पोल-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक: ०४ मार्च, २०१७

**वाचा :**

१) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: आयएसएस -१०१२/प्र.क्र.७१/ विशा-४, दिनांक १४.१०.२०१३.

२) मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पुणे,नाशिक, कल्याण डोंबिवली व नवी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पांबाबत दि.१७.०१.२०१७ रोजी झालेल्या उच्च स्तरीय शक्ती प्रदान समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

पुणे व पिंपरी चिंचवड शहरात सुरक्षेच्या दृष्टिकोनातून कार्यान्वित करण्यात येणाऱ्या सीसीटीव्ही प्रकल्पाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भाधिन क्र.१ येथील नमूद दि.१४ ऑक्टोबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये पोलीस आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आली आहे. तथापि सदर समितीस प्रकल्पाच्या कार्यान्वयन/ सेवा कालावधीत आवश्यक बदल किंवा सुधारणा करण्यासाठी वित्तीय स्वरूपाचे निर्णय घेण्याचे अधिकार देण्यात आले नाहीत. सदर बाब पोलीस आयुक्त, पुणे यांनी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदान समितीच्या दि.१७.०१.२०१७ रोजीच्या बैठकीत निदर्शनास आणून दिल्यावर त्यास समितीने मान्यता दिली. त्यानुषंगाने उच्चस्तरीय शक्ती प्रदान समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीला वित्तीय अधिकार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी गठीत करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीला प्रकल्पाच्या कार्यान्वयन/ सेवा कालावधीत आवश्यक बदल किंवा सुधारणा करण्यासाठी रु.५० लाख मर्यादेपर्यंतच्या खर्चाच्या कामास मंजूरी देण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१७.०१.२०१७ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदान समितीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१२५९४०३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhiraj K Abhang

Digitally signed by Dhiraj K Abhang
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b83edfcbaa0fddb5983e8303bccd9a96ef7cc55853b8b449ff8dc53d69f1618d, cn=Dhiraj K Abhang
Date: 2017.03.04 13:00:43 +05'30'

**( धीरज कां. अभंग )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. पोलीस आयुक्त, पुणे.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४. निवडनस्ती, पोल-३.

*****